पोलीस दलाची पुनर्रचना
पोलीस दल मजबूत व
कार्यक्षम करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक:पीएमएन-०३९७/सीआर-४७४/ पोल-५ब,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२, दिनांक: १५ जुलै,२०००.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्रातील पोलीस दल हे देशातील अग्रेसर दल म्हणून ओळखले जाते.राज्यातील पोलीसांना कर्तव्यावर अहोरात्र अतिशय जोखमिचे व जिवावर बेतणारे काम करावे लागते. घनदाट जंगलातील सशस्त्र नक्षलवादी,सुसज्ज गुंड टोळ्या, संघटीत गुन्हेगारी,दरोडेखोर, यांच्या बरोबर सामना करीत असतांना गेल्या दहा वर्षात महाराष्ट्रामध्ये २४९ पोलीस शिपाई/अधिकारी धारातिर्थी पडले आहेत. महाराष्ट्रातील वाढती गुन्हेगारी,अर्थविषयक नव्याने निर्माण होणारे प्रश्न, महिलांवर अत्याचार,सामाजिक स्वरुपाचे गुन्हे, अशा समस्यांचा बिमोड करण्यासाठी फार मोठया प्रमाणात पोलीसांचे संख्याबळ वाढविणे गरजेचे आहे. परंतु मर्यादित आर्थिक तरतूदीमुळे मोठया प्रमाणात पोलीसांचे संख्याबळ वाढविणे शक्य नाही.महाराष्ट्र राज्याचा विस्तार, लोकसंख्या,औद्यौगिकरण व गुन्हेगारी,रोजचे नवे गुन्हे करण्याचे तंत्र पहाता सध्या असलेली मंजूर पदे अल्प आहेत. पोलीस हा राज्याचा कणा आहे,त्यामुळे पोलीस दल सक्षम होण्यासाठी खास ठोस पावले उचलणे आवश्यक आहे.त्यांच्यामध्ये चैतन्य,गतीमानता व आधुनिकता आणण्यासाठी पध्दतशीर प्रयत्न करणे गरजेचे आहे.यासाठी मा.राज्यमंत्री (गृह)(ग्रामीण) श्री. माणिकराव ठाकरे,यांचे अध्यक्षतेखाली व मा.राज्यमंत्री (गृह)(शहरे) श्री.कृपाशंकर सिंह,सहअध्यक्ष, दिनांक ३१-१२-१९९९ रोजी एक समिती गठीत केली. या समितीने पोलीस दल मजबूत व कार्यक्षम करण्याच्या दृष्टीने मंत्रालयीन पातळीवर, परिक्षेत्रातील, आयुक्तालयातील वरिष्ठ अधिकारी व जिल्हा पोलीस प्रमुख यांच्याशी वेळोवेळी सांगोपांग चर्चा करुन आपला अहवाल दिनांक २४ जानेवारी,२००० रोजी सादर केला. शासनाने या अहवालाचा अभ्यास करुन खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

पोलीस शिपायाच्या एकूण पदापैकी २२३४४ पदे टप्या टप्याने कमी करुन त्याऐवजी पोलीस नाईक ते पोलीस अधीक्षक या संवर्गामध्ये खाली दर्शविल्याप्रमाणे जादा पदे निर्माण करण्यात येतील.

GR-20020122145815000-0200

| | | |
|---|---|---|
| अ) | पोलीस अधीक्षक | १२ |
| ब) | पोलीस उप अधीक्षक | ३३४ |
| क) | पोलीस निरीक्षक | ८३९ |
| ड) | सहाय्यक पोलीस निरीक्षक | ६०३ |
| इ) | पोलीस उप निरीक्षक | ३००० |
| फ) | सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक | ७०१४ |
| ग) | पोलीस हवालदार | ३४६१ |
| ह) | पोलीस नाईक | ७००० |
| | एकूण : | २२३४४ |

अ) पोलीस शिपायांच्या एकूण पदातून २२३४४ पदे टप्प्या टप्प्याने कमी करुन पोलीस नाईक,पोलीस हवालदार,सहाय्यक पोलीस उप निरीक्षक, सहाय्यक पोलीस निरीक्षक व पोलीस निरीक्षक या संवर्गातील पदे २०००-२००१ या आर्थिक वर्षात खाली दर्शविल्याप्रमाणे श्रेणीवाढीने निर्माण करण्यात येतील:-

| | | | |
|---|---|---|---|
| एक) | १) | पोलीस निरीक्षक | ८३९ |
| | २) | सहाय्यक पोलीस निरीक्षक | ६०३ |
| | ३) | सहाय्यक पोलीस उप निरीक्षक | ३५०७ |
| | ४) | पोलीस हवालदार | ३४६१ |
| | ५) | पोलीस नाईक | ७००० |

सहाय्यक पोलीस उप निरीक्षक यांची एकूण ७०१४ पदे निर्माण करावयाची आहेत. या पदांपैकी खाली दर्शविण्यात आल्याप्रमाणे दोन टप्प्यात सदर पदे पदोन्नतीने निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| वर्ष | पदे |
|---|---|
| २०००-२००१ | ३५०७ |
| २००१-२००२ | ३५०७ |

दोन) पोलीस उप निरीक्षकांची ३००० पदे सध्याच्या सेवाप्रवेश नियमानुसार सरळ सेवा आणि पदोन्नतीने भरावयाची असल्यामुळे या पदापैकी १५०० पदे सरळ भरतीने,७५० पदे विभागीय मर्यादित परिक्षेने व ७५० पदे पात्रता परिक्षेने खाली दर्शविल्याप्रमाणे टप्प्या टप्प्याने पाच वर्षात श्रेणीवाढीने निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे.

GR-200201221448150000-0200

| | सरळ भरतीने | विभागीय मर्यादित परिक्षा. | पात्रता परिक्षा |
|---|---|---|---|
| | १५०० पदे | ७५० पदे | ७५० पदे |
| २०००-२००१ | -- | १५० | १५० |
| २००१-२००२ | ३७५ | १५० | १५० |
| २००२-२००३ | ३७५ | १५० | १५० |
| २००३-२००४ | ३७५ | १५० | १५० |
| २००४-२००५ | ३७५ | १५० | १५० |

पोलीस उप अधीक्षक/सहाय्यक पोलीस आयुक्तांची ३३४ पदे सध्याच्या सेवाप्रवेश नियमानुसार सरळ सेवा व पदोन्नतीने भरावयाची असल्यामुळे या पदापैकी १०० पदे सरळ भरतीने व उर्वरीत २३४ पदे खात्यामार्फत बढत्या देऊन खाली दर्शविल्याप्रमाणे टप्प्या टप्प्याने पाच वर्षात निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| वर्ष | सरळ भरतीने १०० पदे | खात्यामार्फत २३४ पदे |
|---|---|---|
| २०००-२००१ | -- | १२८ |
| २००१-२००२ | २५ | ५३ |
| २००२-२००३ | २५ | ५३ |
| २००३-२००४ | २५ | -- |
| २००४-२००५ | २५ | -- |

पोलीस अधीक्षक यांची ९३ पदे ३ वर्षात पदोन्नतीने टप्प्या टप्प्याने निर्माण करण्यास खाली दर्शविल्याप्रमाणे शासन मंजूरी देत आहे :-

| वर्ष | पदोन्नतीने |
|---|---|
| २०००-२००१ | ३३ |
| २००१-२००२ | ३० |
| २००२-२००३ | ३० |

GR.200201221445915000-0200

तीन) याशिवाय १७५ प्रमुख लिपिकांची पदे वरिष्ठ लिपिकामधून व कनिष्ठ श्रेणी लिपिकांमधून १५८ पदे वरिष्ठश्रेणी लिपिक पदावर श्रेणीवाढीने निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे.

ब) मंडल पोलीस निरीक्षकाची पदे रद्द करुन ही पदे पोलीस दलात इतरत्र सामावून घेण्यात येतील.

क) प्रशासकीय गरजेनुसार पोलीस निरीक्षक व त्यावरील जादा पदांच्या जिल्हावार,परिक्षेत्रवार व विभागवार वाटपाबाबतीत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

उपरोक्त उल्लेख केलेल्या श्रेणीवाढीने निर्माण करण्यात येणाऱ्या पदांच्या खर्चाबाबत पुरवणी मागणीद्वारे मागीतलेल्या रक्कमेस मान्यता मिळाल्यानंतर त्याबाबतचे स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील. तोपर्यत प्रशासकीय कार्यवाहीच्या दृष्टीने श्रेणीवाढीने पदोन्नती देण्यासाठी विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकी घेऊन उमेदवारांची निवड करणे,विभागीय मर्यादीत परिक्षा व पात्रता यासंबंधी आवश्यक ती कार्यवाही पूर्ण करणे व सरळसेवा भरतीसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे मागणीपत्र पाठविण्याची इत्यादी कार्यवाही सुरु करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शि.शं. धुनाळे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रत,

योग्य त्या कार्यवाही साठी अग्रेषित-
पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
महालेखापाल,महाराष्ट्र राज्य-१,मुंबई,
महालेखापाल,महाराष्ट्र राज्य-२,नागपूर,
पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई,इत्यादी.

GR-20020122144815000-0200